**राज्यातील भविष्यातील पाणी टंचाई निवारणार्थ पुढील नियोजनासाठी संभाव्य पाणी टंचाई कृती आराखडा २०१५-१६ तयार करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः टंचाई २०१५/प्र.क्र. २३३/पापु १४**
गो. ते. रुग्णालय, ७ वा मजला
मंत्रालय, मुंबई ४०० ००१
तारीखः १ ऑक्टोबर, २०१५

संदर्भ :-

१) **शासन निर्णय, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांकः टंचाई १०९९/प्र.क्र.१२/पापु-१४ दिनांक ३ फेब्रुवारी, १९९९**
२) **शासन निर्णय, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांकः टंचाई १००७/प्र.क्र.१९७/पापु-१४ दिनांक २७ फेब्रुवारी, २००८**
३) **शासन निर्णय, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांकः टंचाई २००८/प्र.क्र.१४९/पापु-१४ दिनांक २१ ऑगस्ट, २००९**

परिपत्रक :-

राज्यात दरवर्षी अपु-या पर्जन्यामुळे किंवा अन्य कारणामुळे ग्रामीण/ नागरी क्षेत्रात पिण्याच्या पाण्याची टंचाई निर्माण होत असते. पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ घ्यावयाच्या उपाययोजनांबाबत कोणताही संभ्रम निर्माण होऊ नये म्हणून या विभागाकडून संदर्भ क्र. १ व २ येथील शासन निर्णयांन्वये स्थायी आदेश निर्गमित करण्यात आले आहेत. सदर स्थायी आदेशानुसार पाणी टंचाई निवारणार्थ घेण्यात येणा-या उपाययोजना दिनांक ३० जून पर्यंत राबविण्यात येतात. राज्यात यावर्षी काही ठिकाणी समाधानकारक पाऊस असला तरी बऱ्याचशा क्षेत्रामध्ये पर्जन्यमान सरासरीपेक्षा कमी झालेले आहे. अशा क्षेत्रात येत्या उन्हाळयात पिण्याच्या पाण्याची टंचाई निर्माण होण्याची शक्यता लक्षात घेऊन शासनाच्या संदर्भाधीन स्थायी आदेशातील सुचनांच्या अनुषंगाने आता पासूनच तत्परतेने कार्यवाही सुरु करणे आवश्यक आहे. त्याकरीता खालीलप्रमाणे सुचना देण्यात येत आहेत

१) महाराष्ट्र भूजल (विकास व व्यवस्थापन) अधिनियम, २००९ मधील कलम २० नुसार घोषित केलेल्या सार्वजनिक पिण्याच्या पाण्याच्या स्त्रोतांच्या प्रभावक्षेत्रात किंवा कलम २१ नुसार प्रभावक्षेत्र अधिसूचित होईपावेतो स्त्रोताच्या ५०० मीटर अंतरामध्ये पिण्याच्या पाण्याच्या प्रयोजनाव्यतिरिक्त इतर

प्रयोजनासाठी कोणत्याही विहिरींचे खोदकाम करण्याची परवानगी न देणे, त्याचप्रमाणे कलम २२ नुसार प्रभावक्षेत्रातील विद्यमान विहिरीतील भूजल उपशामुळे कोणत्याही सार्वजनिक पिण्याच्या पाण्याच्या स्त्रोतावर प्रतिकूल परिणाम होत असल्याचे आढळून येत असल्यास जिल्हा प्राधिकरणाच्या आदेशाद्वारे वाजवी कालावधीकरिता अशा विहिरीमधून भूजल उपसा करण्यास मनाई करणे, तसेच कलम २५ नुसार जिल्हा प्राधिकरण, पावसाचे प्रमाण, स्वरुप व पाणलोट क्षेत्रातील पाण्याच्या पातळीची माहिती किंवा अन्य कोणत्याही संबंधित बाबी लक्षात घेवून एका जल वर्षापेक्षा अधिक नसलेल्या कालावधीकरिता पाणी टंचाई क्षेत्र घोषित करणे, कलम २६ नुसार पाणी टंचाई क्षेत्र घोषित केल्यावर सार्वजनिक पिण्याच्या पाण्याच्या स्त्रोतापासून १ कि. मी. अंतरावरील विहिरीद्वारे भूजल उपशावर तात्पुरती बंदी आणण्याची कार्यवाही जिल्हा प्राधिकरणामार्फत करण्यात यावी.

२) पाणी टंचाई निर्माण झालेल्या गावे / वाडयांमध्ये तसेच नागरी क्षेत्रात आवश्यकतेनुसार स्थानिक परिस्थिती व स्त्रोतांचा विचार करुन पाणी टंचाई निवारणार्थ प्रस्तावित किमान खर्चाच्या योग्य अशा उपाययोजना घेण्याबाबत आवश्यक ती कार्यवाही तातडीने करावी.

३) संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये राज्यात पाणी टंचाई निर्माण होऊ नये म्हणून प्रतिबंधात्मक उपाययोजना ग्रामस्तरावर राबविण्याबाबतच्या सूचना निर्ममित करण्यात आल्या आहेत. त्यानुसार आतापासूनच जलसंधारणासाठी जलयुक्त शिवारअंतर्गत असलेल्या विविध उपाययोजना, पाण्याचे स्त्रोत बळकटीकरणासाठी शिवकालीन पाणी साठवण योजनासह राबविण्याचा कार्यक्रम हाती घ्यावा.

४) संदर्भ क्र ३.येथील शासन निर्णयान्वये दिलेल्या सूचनांनुसार भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणेमधील वरिष्ठ भूवैज्ञानिक ,सहायक भूवैज्ञानिक ,कनिष्ठ भूवैज्ञानिक यांनी संभाव्य टंचाईग्रस्त पाणलोट क्षेत्रनिहाय व गावनिहाय आराखडे तयार करण्याची कामे प्राथम्यक्रमाने हाती घ्यावीत .तसेच प्रत्येक जिल्हयांमधील ज्या तालुक्यामध्ये सरासरीपेक्षा ५० टक्के कमी पाऊस पडला आहे .तसेच पाण्याची पातळी सरासरी पातळीपेक्षा २ मीटरने खाली गेलेली आहे अशा तालुक्यांमधील गावांची यादी तातडीने तयार करावी.

५) अशा गावांत राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम जलस्वराज्य इ. योजनांतर्गत चालू असलेल्या योजनांचे स्त्रोत बळकटीकरणाचे काम वेळेत पूर्ण करुन त्यातील पाण्याचा लाभ गावाला लवकरात लवकर मिळेल याकरिता कार्यवाही करण्यात यावी.

६) प्रत्येक जिल्हयातील अस्तित्त्वात असलेल्या विंधण विहिंरीची वेळोवेळी दुरुस्ती करुन त्या चालू अवस्थेत ठेवणेबाबत जिल्हाधिकारी यांनी आवश्यक ती कार्यवाही करावी.

७) जिल्ह्यामध्ये अनेक योजना या मोठ्या, मध्यम व लघु पाटबंधारे प्रकल्पाच्या पाण्यावर अवलंबून असतात. अशा ठिकाणी पाण्याची नेमकी गरज किती आहे याचा अंदाज घ्यावा. प्रकल्पाच्या जलाशयात आवश्यक तेवढे पाणी पिण्याकरिता राखून ठेवून त्याच्या वापराबद्दल नियोजन करावे. पाण्याचा अनिर्बंध उपसा तसेच अपव्यय होणार नाही याबाबत जिल्हा परिषदांनी दक्षता घ्यावी.

८) राज्यातील संभाव्य पाणी टंचाईग्रस्त गावे व वाड्यांसाठी शासनाचे स्थायी आदेशातील विहित केलेल्या उपाययोजनांपैकी योग्य उपाययोजनांचा सन २०१५-१६ साठी संभाव्य टंचाई कृती आराखडा करुन शासनास सादर करण्यात यावा. सदरचा कृती आराखडा तयार करताना ज्या योजनांचा लाभ टंचाई कालावधीतच होऊ शकेल अशा तुलनात्मक कमी खर्चाच्या उपाययोजना प्रस्तावित करण्यात येतील याची जाणीवपूर्वक दक्षता घ्यावी. सन २०१४-१५ मधील पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ घेण्यात आलेल्या उपाययोजना व प्रत्यक्षात घेतलेल्या उपाययोजनांची संख्या यात लक्षणीय फरक आढळून आला आहे. तरी, संभाव्य कृती आराखड्यातील प्रस्तावित उपाययोजनांची संख्या अचूकपणे नोंदवावी.

९) पिण्याच्या पाण्याचा टंचाई निवारणासाठी करावयाच्या तातडीच्या उपाययोजना ठरवितांना त्यासाठी होणारा खर्च, त्याचा भविष्यात होणारा फायदा तसेच त्या उपाययोजना कार्यान्वित करण्यासाठी लागणारा वेळ या बाबींचा प्रामुख्याने विचार करण्यात यावा. टंचाई निवारण उपाययोजनेची निवड करताना ती उपलब्ध माहिती, टंचाईचा कालावधी व स्थानिक परिस्थितीचा विचार करता किमान खर्चाची असावी याची दक्षता घेण्यात यावी. याप्रमाणे तयार केलेल्या टंचाई कृती आराखड्याच्या कार्यान्वयाचे संनियंत्रण जिल्हाधिकारी यांच्याकडे राहील.

१०) ज्या ठिकाणी अन्य तातडीच्या उपाययोजना घेता येत नाही तेथे टँकर/बैलगाडीद्वारे पाणी पुरवठा करताना शक्यतो शासकीय टँकरचा वापर करण्यात यावा असे शासनाचे धोरण आहे. तथापि असा अनुभव आहे की, पिण्याच्या पाण्याचा पुरवठा करताना खाजगी टँकरचा वापर करण्यात येतो. जिल्हाधिकारी ज्यावेळी पिण्याच्या पाण्याचा पुरवठा करण्यासाठी संबंधित विभागाच्या क्षेत्रीय अधिकाऱ्यांकडे टँकरची मागणी करतात त्यावेळी त्यांना अनेकदा सुस्थितीत/वापरात नसलेले टँकर पुरविले जातात. त्यामुळे खाजगी टँकर्स या कामी भाड्याने घेणे भाग पडते. परिणामी शासकीय खर्चामध्ये मोठ्या प्रमाणात वाढ होते. त्यामुळे सर्व क्षेत्रीय अधिकाऱ्यांना अशा सक्त सूचना देण्यात येत आहेत की, त्यांनी त्यांच्या अधीन असलेले टँकर्स सुस्थितीत ठेवावे आणि पिण्याच्या पाण्याचा पुरवठा करण्यासाठी जिल्हाधिकारी ज्या वेळी मागणी करतील त्यावेळी त्यांना पूर्णपणे कार्यक्षम स्थितीतील टँकर त्वरेने पुरविण्यात यावेत.

११) आपल्या विभागातील पाणी टंचाई निवारणार्थ उपसा बंदीचे आदेश पारीत करुन अथवा तात्पुरत्या उपाययोजना करुन कायमची टंचाई दूर होणार नाही हे निदर्शनास आल्यास क्षेत्रीय यंत्रणेने नियोजन व माहितीचे संकलन करणे आवश्यक आहे. या गावांचे नकाशे, वाड्यांची यादी/पाणी पुरवठा केलेल्या गावांची तालुका व वर्षनिहाय गावे, झालेल्या खर्चाची माहिती इत्यादि माहितीचे संकलन करुन त्या आधारे पुढील नियोजनासाठी संभाव्य टंचाई कृती आराखडा तयार करणे आवश्यक आहे. तसेच टँकरने पिण्याच्या पाण्याचा पुरवठा करताना टँकर फेऱ्यावरील नियंत्रण ठेवण्याकरिता नवीन निविदा स्विकारतांना व टँकरधारकांबरोबर करारनामे करताना टँकरवर GPS यंत्रणा बसविण्याबाबत तसेच सदर यंत्रणेची देखभाल दुरुस्ती टँकर वाहतुकदाराने स्वत:च्या खर्चातून करण्याबाबतची अट नमूद करावी.

१२) आपल्या विभागातील नागरी क्षेत्रातील पिण्याच्या पाणी टंचाई निवारणार्थ तातडीच्या पाणी पुरवठा योजनांना मान्यता देण्याबाबत क्षेत्रिय कार्यालयामार्फत होणारी दिरंगाई टाळण्यासाठी संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णयाच्या तरतुदीनुसार विहित आर्थिक व भौतिक निकषात न बसणारे प्रस्ताव सबळ कारण आणि सुस्पष्ट शिफारशीसह शासनाकडे सादर करावेत तसेच संभाव्य टंचाई कृती आराखडे अपेक्षित खर्चासह शासनास सादर करावेत.

२. एकंदरीत पिण्याच्या पाण्याच्या टंचाई क्षेत्रात पाणी पुरवठा सुरळीत व्हावा व त्यावरील शासकीय खर्च मर्यादित रहावा यासाठी वरील सुचनांचे काटेकोरपणे पालन करण्याची दक्षता घेण्यात यावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१५०९२८१२०२०६३४२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shantaram S Kudale

Digitally signed by Shantaram S Kudale
DN: CN = Shantaram S Kudale, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.10.01 17:08:43 +05'30'

**(शां. सि. कुदळे)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे

२. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई
३. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई
४. सर्व विभागीय आयुक्त
५. सर्व जिल्हाधिकारी
६. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
७. सर्व उप सचिव/मुख्य अभियंता तथा विशेष कार्य अधिकारी, पा.पु. व स्व.वि., मंत्रालय, मुंबई
८. सर्व मुख्याधिकारी, नगर परिषद
९. सर्व वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा
१०. सर्व विभागीय उप संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा
११. सर्व विभागीय मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण
१२. सर्व कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद
१३. प्रधान सचिव (पापुवस्ववि) यांचे स्वीय सहायक
१४. निवड नस्ती